अर्जित रजा साठविणे व रजेचे रोखीकरण करणे
यांच्या कमाल मर्यादा वाढविण्याबाबत.

महाराष्ट्र शासन

**वित्त विभाग**

शासन निर्णय क्रमांक वेआशि-१२८७/३९९/८७/सेवा-१०

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२, दिनांक ११ ऑक्टोबर १९८८

## शासन निर्णय

चौथ्या केंद्रीय वेतन आयोगाने अर्जित रजा साठविण्याची सध्या अस्तित्वात असलेली १८० दिवसांची मर्यादा २४० दिवसांपर्यंत वाढवावी अशी शिफारस केली आहे. तसेच, सेवानिवृत्तीच्या वेळी अर्जित रजेचे रोखीकरण करण्याची मर्यादा-सुद्धा २४० दिवस करावी अशीही शिफारस केली आहे. या शिफारशी केंद्र शासनाने स्वीकारल्या असून त्यानुसार केंद्रीय नागरी सेवा (रजा) नियम, १९७२ मधील संबंधित तरतुदी सुधारण्यात आल्या आहेत. या सुधारणा स्वीकारण्याचा प्रश्न काही काळ राज्य शासनाच्या विचाराधीन होता. शासन असा आदेश देत आहे की, महाराष्ट्र नागरी सेवा (रजा) नियम, १९८१ मधील सध्या अस्तित्वात असलेल्या तरतुदी खालीलप्रमाणे सुधारण्यात याव्यात :—

(ए) नियम ५० (१) (बी) तसेच, नियम ५४ मध्ये तरतूद केल्याप्रमाणे अर्जित रजा साठविण्याची १८० दिवसांची सध्याची कमाल मर्यादा २४० दिवस इतकी वाढविण्यात यावी;

(बी) खाली नमूद केलेल्या प्रकरणांमध्ये, न उपभोगिलेल्या अर्जित रजेचे रोखीकरण करण्याची १८० दिवसांची सध्या असलेली मर्यादा २४० दिवस इतकी वाढविण्यात यावी :—

(एक) नियत सेवावधि सेवानिवृत्ती [नियम ६८(१)];

(दोन) शासकीय कर्मचाऱ्याची सेवा लोकहिताच्या दृष्टीने त्याच्या नियत सेवावधि सेवानिवृत्तीच्या दिनांकापुढे वाढविण्यात आली असेल अशा प्रकरणी [नियम ६७(२)];

(तीन) स्वेच्छा/मुदतपूर्व सेवानिवृत्ती [शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक पीईएन-१०८३/सीआर-१२९६/८३/एसईआर-४, दिनांक १ ऑक्टोबर १९८४ चा परिच्छेद (५)];

(चार) जेथे शासकीय कर्मचाऱ्याची सेवा नोटिशीद्वारे अथवा नोटिशीच्या बदल्यात वेतन व भत्ते देऊन, अथवा त्याच्या नियुक्तीच्या अटी व शर्तीप्रमाणे अन्य प्रकारे समाप्त करण्यात आली असेल अशा प्रकरणी [शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक पीईएन-१०८३/सीआर-१२९६/८३/एसईआर-४, दिनांक १ ऑक्टोबर १९८४ चा परिच्छेद (५)];

(पाच) सेवानिवृत्तीनंतरच्या पुनर्नियुक्तीच्या समाप्तीनंतर [नियम ६५(२)(ए)];

(सहा) सेवेत असताना कर्मचाऱ्याचा मृत्यू झाल्यास, त्याच्या कुटुंबाला देतेवेळी (नियम ६९);

(सात) सेवानिवृत्तिपूर्व रजेच्या प्रकरणी [नियम ६६(१)];

(आठ) शासकीय कर्मचाऱ्याचे सार्वजनिक उपक्रमामध्ये समावेशन झाल्याच्या प्रकरणी [शासन निर्णय वित्त विभाग, क्रमांक पीईएन-१०८०/सीआर-२१०/एसईआर-४, दिनांक २८ एप्रिल १९८१ चा परिच्छेद (६)]

(सी) जेव्हा शासकीय कर्मचारी राजीनामा देईल किंवा नोकरी सोडील अशा प्रकरणी सेवासमाप्तीच्या दिनांकाला त्याच्या खाती जमा असलेल्या एकूण अर्जित रजेच्या अर्ध्या रजेच्या सममूल्य इतके रोखीकरण त्याला देय राहील. परंतु असे रोखीकरण १२० दिवसांपेक्षा अधिक मिळणार नाही [नियम ६७(३)].

२. हे आदेश दिनांक १ सप्टेंबर १९८८ पासून अंमलात येतील.

३. शासन असाही आदेश देत आहे की, शासकीय कर्मचाऱ्याला त्याच्या सेवेच्या शेवटच्या १० वर्षांच्या कालावधी-मध्ये अर्जित रजा सहसा नामंजूर करू नये, जेणेकरून १८० दिवसांपुढे अर्जित रजेची साठवण होणार नाही. वरील सूचनांचे काटेकोरपणे पालन होत आहे याची खबरदारी रजा मंजूर करणाऱ्या सक्षम प्राधिकाऱ्यांनी घ्यावी.

(शा.म.मु.) एच १६३५ (१५,०००—१०—८८)

४. महाराष्ट्र नागरी सेवा (रजा) नियम, १९८१ मधील यासंबंधीच्या विद्यमान तरतुदी या शासन निर्णयामधील तरतुदींपुरत्या सुधारण्यात आल्या आहेत असे मानण्यात यावे. उपरोक्त नियमांत रीतसर सुधारणा यथावकाश करण्यात येईल.

५. या शासन निर्णयाची इंग्रजी प्रत सोबत जोडली आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

व्यं. दे. पानसे,
शासनाचे सह सचिव.

प्रति

महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई.
महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, नागपूर.
महालेखापाल-१ (लेखापरीक्षा), महाराष्ट्र, मुंबई.
महालेखापाल-२ (लेखापरीक्षा), महाराष्ट्र, नागपूर.
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई.
राज्यपालांचे सचिव.
मुख्य मंत्र्यांचे सचिव.
सर्व मंत्री आणि राज्यमंत्री यांचे स्वीय सहाय्यक.
मंत्रालयीन विभाग.
सर्व विभागीय आयुक्त.
मंत्रालयाच्या सर्व विभागांखालील विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख.
*प्रबंधक, उच्च न्यायालय (मूळ शाखा), मुंबई.
*प्रबंधक, उच्च न्यायालय (अपील शाखा), मुंबई.
*सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई.
*सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
*प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई.
सिनियर रिसर्च ऑफिसर, पे रिसर्च युनिट, भारत सरकार, वित्त मंत्रालय (व्यय विभाग), खोली क्र. २६१, नॉर्थ ब्लॉक, नवी दिल्ली.
संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.
मुख्य लेखापरीक्षक, स्थानिक निधी हिशेब, मुंबई.
उप मुख्य लेखापरीक्षक, स्थानिक निधी हिशेब, मुंबई/पुणे/नागपूर/औरंगाबाद/नाशिक/अमरावती.
जनसंपर्क अधिकारी, मंत्रालय, मुंबई.
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी.
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य लेखा व वित्त अधिकारी.
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
वित्त विभागातील सर्व कार्यासने.
निवड फाईल, वित्त विभाग---सेवा-१०.

*पत्राद्वारे

१९८८ चा क्रमांक

माहिती व मार्गदर्शनाकरिता प्रत रवाना.

**Enhancement of the ceiling on accumulation and encashment of Earned Leave.**

GOVERNMENT OF MAHARASHTRA

FINANCE DEPARTMENT

Resolution No. PCR. 1287/399/87/SER-10

Mantralaya, Bombay 400 032, dated 11th October 1988

*GOVERNMENT RESOLUTION*

The IVth Central Pay Commission has recommended that the existing limit of 180 days on accumulation of earned leave may be raised to 240 days. They have also recommended that the limit of encashment of earned leave at the time of retirement may also be raised to 240 days. These recommendations have been accepted by the Government of India and accordingly the provisions of Central Civil Services (Leave) Rules, 1972 have been modified by the Government of India. The question of adopting these modifications was under consideration of the State Government for some time past. Government is pleased to direct that the existing provisions of the Maharashtra Civil Services (Leave) Rules, 1981 should be modified as follows:—

(*a*) The existing maximum limit of 180 days on accumulation of leave provided under Rules 50(1)(*b*) and 54 *ibid.* shall be enhanced to 240 days;

(*b*) The existing ceiling of 180 days for availing the benefit of encashment of unutilised earned leave shall be increased to 240 days in respect of following categories :—

(*i*) retirement on attaining the age of superannuation (Rule 68(1)] ;

(*ii*) cases where the service of a Government servant has been extended, in the interest of public service beyond the date of retirement on superannuation [Rule 67(2)] ;

(*iii*) voluntary/premature retirement (Para 5 of G. R., F. D., No. PEN-1083/CR-1296/83/SER-4, dated 1st October 1984);

(*iv*) where the services of a Government servant are terminated by notice or by payment of pay and allowances in lieu of notice, or otherwise in accordance with the terms and conditions of his appointment (Para 5 of G. R., F. D., No. PEN-1083/CR-1296/83/SER-4, dated 1st October 1984);

(*v*) in the case of termination of re-employment after retirement [Rule 65(2)(*a*)] ;

(*vi*) in the case of death of a Government servant while in service, to the family of the deceased (Rule 69);

(*vii*) in the case of leave preparatory to retirement [Sub-rule (1) of Rule 66] ;

(*viii*) on absorption of a Government servant in the public sector undertakings (Para 6 of G. R., F. D., No. PEN-1080/CR-210/SER-4, dated 28th April 1981).

(*c*) A Government servant who resigns or quits service shall be entitled to cash equivalent in respect of earned leave at credit on the date of cessation of service, to the extent of half of such leave at his credit, subject to a maximum of 120 days [Rule 67 (3)].

2. These orders shall take effect from 1st September 1988.

3. Government is also pleased to direct that earned leave should not ordinarily be denied to any employee in the last 10 years of his career so that earned leave accumulation beyond 180 days does not take place. The leave sanctioning authorities are, therefore, requested to ensure that these instructions are followed scrupulously.

4. The existing provisions of the Maharashtra Civil Services (Leave) Rules, 1981 in this respect should be deemed to have been amended to the extent of the provisions of this resolution. A formal amendment to these rules will be issued in due course.

By order and in the name of the Governor of Maharashtra,

V. D. PANSE,
Joint Secretary to Government.